“चांदा ते बांदा” योजनेंतर्गत सिंधुदुर्ग जिल्हास्तरावर जिल्हा व्यवस्थापन कक्षात कार्यरत असलेल्या श्री. ग. स. धनवडे, जिल्हा समन्वयक यांना कार्यमुक्त करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन आदेश क्रमांक-इएसटी-११२०/प्र.क्र.३८/ का.१४२७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २५ जून, २०२०

**संदर्भ :-** १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.डीएपी-१०१५/प्र.क्र.५१/का.१४८१, दि.२९ जून, २०१६
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.डीएपी-१०१६/प्र.क्र.१८६/का.१४८१, दि.१८ नोव्हेंबर, २०१६
३) नियोजन विभाग, शासन आदेश क्र.बदली-१११९/प्र.क्र.३७/का.१४२७, दि.११ जून, २०१९

**शासन आदेश**

राज्य शासनाने चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यांमध्ये “रिसोर्स बेस्ड इंटेसिव्ह प्लॅनिंग व डेव्हलपमेंट” हा पथदर्शी कार्यक्रम राबविण्यासाठी संदर्भाधीन अ.क्र.१ वरील शासन निर्णयान्वये “चांदा ते बांदा” ही योजना राबविण्यास मान्यता दिलेली आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी चंद्रपूर व सिंधुदुर्ग या दोन जिल्ह्यांसाठी संदर्भाधीन अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये जिल्हास्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्षामध्ये पदनिर्मिती करण्यास मान्यता दिलेली आहे. “चांदा ते बांदा” ही योजना सन २०१६-१७ ते सन २०१९-२० या चार वर्षांच्या कालावधीसाठी राबविण्यात येणार होती. त्यामुळे सदर योजनेचा कालावधी दि.३१/०३/२०२० रोजी संपुष्टात आला. ही वस्तुस्थिती विचारात घेऊन चंद्रपूर व सिंधुदुर्ग जिल्ह्यांमध्ये जिल्हा व्यवस्थापन कक्षासाठी निर्माण केलेल्या पदांनाही मुदतवाढ देण्यात आलेली नाही. यास्तव, सदर पदांवर कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यांना समायोजनाद्वारे अन्य पदांवर पदस्थापना देणे आवश्यक आहे.

२. श्री.ग.स.धनवडे, जिल्हा समन्वयक, जिल्हा प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, चांदा ते बांदा योजना, सिंधुदुर्ग यांची संदर्भाधीन अ.क्र.३ येथील शासन आदेशान्वये “संख्याशास्त्रज्ञ, सहकार आयुक्त व निंबधक, सहकारी संस्था, पुणे” या पदावर बदली करण्यात आलेली आहे. श्री.ग.स.धनवडे यांना बदलीने पदस्थापना दिलेल्या पदावर पदस्थापना स्वीकारण्यासाठी या आदेशान्वये कार्यमुक्त करण्यात येत आहे. त्यांनी बदलीने नियुक्त

केलेल्या पदाचा कार्यभार स्वीकारावा व तसे शासनास आणि संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना अवगत करावे.

३. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन आदेश उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्र.२०२००६२५१८०४०५२३१६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

आदेशानुसार,

Tushar Purushottam Hirlekar

Digitally signed by Tushar Purushottam Hirlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6dd848a31422ed36ba4503d4744b6dc20833c851babace12b16b7bba3f67cca2, cn=Tushar Purushottam Hirlekar
Date: 2020.06.30 15:26:28 +05'30'

**( तु.पु.हिर्लेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२) मा.मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव.
३) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, कोकण व पुणे.
४) आयुक्त, सहकार व निबंधक सहकारी संस्था, पुणे.
५) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सिंधुदुर्ग व पुणे.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग व पुणे.
७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
८) सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण.
९) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण.
१०) उपसचिव (का.१४१८), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) उपसचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, सिंधुदुर्ग व पुणे.
१४) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, सिंधुदुर्ग.
१५) श्री.ग.स.धनवडे, जिल्हा समन्वयक, जिल्हा प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, चांदा ते बांदा योजना, सिंधुदुर्ग.
१६) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१७) निवडनस्ती.